**मेरी संस्थे अंतर्गत करण्यात येणा-या मृद व सामग्री चाचण्यांचे दर ठरविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय : संकीर्ण - २०२२/(प्र.क्र.०८/२२)/लाक्षेवि (आस्था)**
**मंत्रालय, मुंबई - ४०००३२.**
**दिनांक : ०४/०५/२०२२**

**संदर्भ :-** १. पाटबंधारे विभाग, शासन निर्णय क्र.P.२०/(७४६)-WRI-(२), दि.१२/०४/१९७८.

**प्रस्तावना -**

मेरी ही संस्था महाराष्ट्रात व देशभरात मोठ्या प्रमाणावर अभियांत्रिकी संशोधना विषयी नाविन्यपूर्ण काम करीत असल्याची ख्यातीप्राप्त संस्था आहे. मेरी नाशिक या कार्यालयाच्या अंतर्गत माती/मुरूम व विविध बांधकाम साहित्य तपासणीची कामे अनेक वर्षापासून होत असून, येथील प्रयोगशाळेची विश्वासार्हता मोठी आहे. मात्र चाचण्यांचे शुल्क सन १९७८ च्या शासन निर्णयामध्ये नमूद केलेल्या कार्यपद्धतीनुसार परिगणीत करण्यात येत असून सदर कार्यपद्धती अद्यावत करणे आवश्यक झाले आहे. या अनुषंगाने संदर्भाधीन शासन निर्णय अधिक्रमित करून शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय -**

१) मेरी द्वारे करण्यात येणा-या चाचण्यांचे शुल्क ठरविण्याकरिता संदर्भाधीन दि.१२/०४/१९७८ नुसार निर्गमित केलेला शासन निर्णय याद्वारे अधिक्रमित करण्यात येत आहे.

२) मेरी, नाशिक द्वारे करण्यात येत असलेल्या माती/मुरूम तसेच विविध बांधकाम साहित्यांच्या चाचण्यांकरीता दर ठरविण्यास्तव दर पृथ:करणाचे तक्ते (Rate Analysis Template) महासंचालक, मेरी यांनी निश्चित करावे. सदर Rate Analysis Template ठरवितांना दरात समाविष्ट करावयाच्या सर्व बाबींची टक्केवारी, त्याची कारणमिमांसा स्पष्ट करून अंतिम करण्यात यावी.

३) सदर चाचण्यांचे शुल्क ठरविण्याचे पूर्ण अधिकार महासंचालक, मेरी यांना याद्वारे प्रदान करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय आंतर वित्त सल्लागार व सह सचिव यांच्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेताक २०२२०५०४१५०८०४६६२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PURNIMA
DEVANG DESAI

Digitally signed by PURNIMA DEVANG DESAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=949e11d9f47452e1756c38e35b6f35f56ed936d055f1ff2c622aef6d98ab6f45, pseudonym=F2EE5DB2EAD70020050F89A04FDEE4D600CFC629, serialNumber=4EBE868A2B44904EFA132127F4DE695C80797533C7F4FB249598B0F90102629B, cn=PURNIMA DEVANG DESAI
Date: 2022.05.04 15:08:58 +05'30'

**(पूर्णिमा देसाई)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:**

१. मा.मंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. अप्पर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय यांचे स्वीय सहायक.

४. सचिव (जसंव्य व लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. सचिव (प्रकल्प समन्वय) यांचे स्वीय सहायक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. प्रधान सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई-३२.
७. महासंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी संशोधन संस्था (मेरी), नाशिक.
८. सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ, औरंगाबाद/नागपूर/पुणे/जळगाव/ठाणे.
९. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
१०. सर्व अधीक्षक अभियंता, जलसंपदा विभाग.
११. अधीक्षक अभियंता व सहसंचालक, महाराष्ट्र अभियांत्रिकी प्रशिक्षण प्रबोधिनी, (मेटा), नाशिक.
१२. सह सचिव (सेवा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३. आंतर वित्त सल्लागार व सह सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१४. कक्ष अधिकारी, वित्त विभाग(सेवा-५ व ६/व्यय-१२), मंत्रालय, मुंबई-३२.
१५. निवडनस्ती/लाक्षेवि (आस्था).